विषय : व्हिडिओ फिल्म चित्रपटांसहित कॉपीराईट हस्तांतरणावरील विक्रीकराबाबत.
(महाराष्ट्र भाडे करार अधिनियम १९८५)

महाराष्ट्र शासन
वित्त विभाग

शासन निर्णय क्रमांक-विकअ- ११.००/प्रक्र १५०/कराधान-१
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२ दिनांक- २१ मे २००५

प्रस्तावना:-

महाराष्ट्र भाडे कराराच्या अंमलबजावणीत अंतर्भूत असलेल्या वस्तुतील हस्तांतरणावरील विक्रीकर अधिनियम १९८५ च्या परिशिष्टात दिनांक २८.४.२००० (RUG.३२.००CR.९३.अ/कराधान-१) च्या अधिसुचनेनुसार करण्यात आलेल्या सुधारणानुळे परिशिष्ट २१(४) नुसार दिनांक १ मे २००० पासून चित्रपट कॉपीराईटच्या व व्हिडीओफिल्मच्या लिजवर ४ टक्क्याने कर लावण्याची तरतूद करण्यात आली होती.

या प्रश्नावर शासन स्तरावर झालेल्या चर्चेनुसार दिनांक ९.२.२००१ च्या पत्र क्रमांक- विकअ-११/प्र.क्र.१५०/कराधान-१ अन्वये चित्रपटाच्या कॉपीराईटच्या व व्हिडीओफिल्मच्या लिजवरील विक्रीकरास स्थगिती देण्यात होती.

याबाबत सिनेफिल्मवर व व्हिडीओ फिल्मवर असलेला कर संबधित मोशन पिक्चर्स असोसिएशनना मान्य नसल्यामुळे संबधित संघटनेने शासनाला निवेदने दिली होती. या व्यावसायिकांनी/संघटनेनी वेळोवेळी दिलेल्या निवेदनावर व त्यांच्या अडचणींचा साकल्याने विचार करुन मा.वित्तमंत्री यांनी दिनांक २१ मार्च २००५ चे अर्थसंकल्पिय भाषण भाग-२ मधील अर्थसंकल्प २००५-२००६ मध्ये व्हिडिओ चित्रपटांसहित चित्रपटांच्या कॉपीराईट हस्तांतरणावरील करावर दिनांक १ मे २००० पासून योग्य ते प्रशासकीय सहाय्य मंजूर करण्याचे प्रस्तावित केले आहे.

## शासन निर्णय

त्यानुसार शासन खालीलप्रमाणे प्रशासकीय सवलत देण्याचा निर्णय करीत आहे.

१) दिनांक १.५.२००० पासून ते ३१.३.२००५ पर्यन्तच्या कालावधीकरीता व्हिडीओ चित्रपटांसहित चित्रपटांच्या कॉपीराईट हस्तांतरणावर वस्तुहस्तांतरण कायदयान्वये

जो कर लागू झाला असता तो दि.३१.३.२००५ पर्यन्त संपणा-या कालावधीसाठी प्रशासकीय सवलत म्हणून वसूल केला जाणार नाही.

२) तसेच, त्या कराच्या अनुषंगाने जी शास्ती व व्याज लागू झाले असते त्याचीही वसूली प्रशासकीय सवलत म्हणून करण्यात येणार नाही. परंतु ज्या प्रकरणात या प्रकारचा कर, व्याज व शास्ती पूर्णत: किंवा अंशत: वसूल केली असेल किंवा भरली असेल त्या प्रकरणात न भरलेल्या किंवा वसूल न केलेल्या रकमेपर्यन्त माफी दिली जाईल.

३) प्रशासकीय सवलत अनुज्ञेय असण्याकरीता महाराष्ट्र मुल्यवर्धित कर २००२ अन्वये नोंदणी दाखल्यास पात्र असल्यास सदर व्यापा-याने दि.३०.९.२००५ पर्यन्त नोंदणी दाखला घेणे आवश्यक आहे.

प्रशासकीय सहाय्य मंजूर करण्याचे अधिकार, विक्रीकर आयुक्त,महाराष्ट्र राज्य,मुंबई यांना देण्यात येत असून, आवश्यकतेनुसार सदर अधिकार आयुक्तांच्या प्रशासकीय नियंत्रणाखालील अपर विक्रीकर आयुक्त, विक्रीकर उपायुक्त(प्रशा), ज्येष्ठ सहायक विक्रीकर आयुक्त, सहायक विक्रीकर आयुक्त(प्रशासन), विक्रीकर अधिकारी अथवा त्या दर्जाखालील इतर संबंधित अधिका-यांना हे अधिकार प्रदान करण्याची परवानगी विक्रीकर आयुक्तांना देण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( सुधाकर जामोदे )
शासनाचे उपसचिव,

प्रति,

१ विक्रीकर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, विक्रीकर भवन, माझगांव, मुंबई - ४०० ०१०
( ४० प्रती )

प्रत :-
माहितीसाठी व आवश्यक त्या पुढील कार्यवाहीसाठी अग्रेषित,

१) महालेखापाल ( लेखा परीक्षा ) १, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२) महालेखापाल ( लेखा परीक्षा ) २, महाराष्ट्र राज्य, नागपूर.
३) संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
४) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
५) निवासी लेखा पीरक्षक, मुंबई.
६) महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय. मुंबई.
७) निवड नस्ती, कराधान-१